आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शिर्षांतर्गत निधी वितरण (लेखाशीर्ष २२०२ १९०१, २२०२ १९४८ व २२०२ एच ९७३-वेतन)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र.०४/का-६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०६ सप्टेंबर, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१.४.२०२४.
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.
३) आदिवासी विकास विभाग शा.नि. क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.०४/का-६, दि.१२.०४.२०२४ व दि.३१.०७.२०२४.
४) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची नस्ती क्र.अनुवि-४९२४/ प्र.क्र.४७/अर्थसंकल्प.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत शालेय शिक्षण विभागाच्या अधिनस्त माध्यमिक शाळा, कनिष्ठ महाविद्यालये व सैनिकी शाळांमधील कर्मचाऱ्यांना वेतन अदा करण्याकरीता वित्त विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या एकूण ४८% निधी मर्यादेतील वितरणासाठी उपलब्ध असलेला उर्वरीत ८% मर्यादेतील अवितरीत निधी वितरीत करण्याबाबत शालेय शिक्षण विभागाने संदर्भाधीन क्र.४ अन्वये विनंती केली आहे. शालेय शिक्षण विभागाच्या उपरोक्त प्रस्तावास अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमातर्गत सन २०२४-२५ अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२०२- सर्वसाधारण शिक्षण या मुख्य लेखाशिर्षांतर्गत वित्त विभागाने वितरणाकरीता उपलब्ध करून दिल्याप्रमाणे वेतनासाठी वार्षिक अर्थसंकल्पीत तरतुदींच्या ४८% मर्यादेतील वितरणासाठी शिल्लक असलेल्या उर्वरीत ८% मर्यादेतील निधी खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

(रु. लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित तरतूद सन २०२३-२४ | यापूर्वी वितरीत निधी | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (लेखाशिर्ष २२०२१९०१) | ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) | १०४८१.८६ | ४१९२.७४ | ८३८.५४८८ |
| २ | अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान (लेखाशिर्ष २२०२१९४८) | | ६१३.२४ | २४५.२९ | ४९.०५९२ |
| ३ | सैनिक शाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य (लेखाशिर्ष २२०२ एच ९७३) | | ३७६२.९९ | १५०५.१९ | ३०१.०३९२ |
| **एकूण** | | | **१४८५८.०९** | **५९४३.२२** | **११८८.६४७२** |

२.	उपरोक्तप्रमाणे **एकूण रु.११८८.६४७२ लाख (अक्षरी रुपये अकरा कोटी अठ्ठयाऐंशी लाख चौंसष्ट हजार सातशे वीस फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई** यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३.	सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४.	नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५.	आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील.

६.	सदर शासन निर्णय वित्त विभागाचा संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकातील तरतुदींस अनुसरुन, वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत व प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

७.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२८१७३६२६९२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRADEEP RAMCHANDRA MORE

Digitally signed by PRADEEP RAMCHANDRA MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=c62a84635af1af3d28cc19eeb7308ac22a78a4b28fb5d654700269da75d60aa8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3B6C8332E4A8523ACECD736AC47FF2BA698F66CC8A18822C2707D7F1BB024B5A, cn=PRADEEP RAMCHANDRA MORE
Date: 2024.09.06 13:19:49 +05'30'

**(प्रदिप रा.मोरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२.
१०. कार्यासन-११, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
११. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.